**अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती योजनेअंतर्गंत अदा करावयाच्या इतर शुल्काच्या (other fees) बाबी निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्र. अजाशि-२०१९/प्र.क्र.३४५/शिक्षण-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ जानेवारी, २०२०

**वाचा :-**

(१) शासन निर्णय, सा.न्या.सा.का.क्रि व वि.स. विभाग क्र.इबीसी-२००३/प्र.क्र..३०१/मावक-२, दिनांक १ नोव्हेंबर,२००३.
(२) शासन निर्णय, सा.न्या. सा.का.क्रि.व वि.स. विभाग क्र. इबीसी-२००४/प्र.क्र.३०/मावक-२, दिनांक ५ जानेवारी,२००५.
(३) शासन परिपत्रक, सा.न्या.सा.का.क्रि.व वि.स. विभाग क्र.इबीसी-२००५/प्र.क्र.१२८/मावक-२, दिनांक २७ जून, २००५.
(४) शासन परिपत्रक, सा.न्या. सा.का.क्रि व वि.स. विभाग क्र. इबीसी-२०१७/प्र.क्र.४५/शिक्षण, दिनांक ५.१२.२०१८.
(५) आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/भासशि/२०१९-२०/का-४ब/२५२६, दिनांक २५.११.२०१९

**प्रस्तावना :-**

अनुदानित व विनाअनुदानित महाविद्यालयामध्ये कला, विज्ञान आणि वाणिज्य या शाखामध्ये शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना, त्या महाविद्यालयाच्या संबंधित विद्यापीठाने ठरविलेल्या दराप्रमाणे शिक्षण शुल्क, प्रयोगशाळा शुल्क, ग्रंथालय शुल्क, इतर शुल्क, एक्स्ट्रा क्युरिक्युलर ॲक्टीव्हिटीज, मॅगेझीन फी, नोंदणी शुल्क, कॉम्प्युटर प्रॅक्टिकल शुल्क व परिक्षा शुल्क याची महाविद्यालयाला प्रतिपूर्ती करण्याच्या सूचना संदर्भीय दिनांक २७ जून, २००५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या होत्या.

२. तद्नंतरच्या कालावधीमध्ये महाविद्यालयांमार्फत राबविण्यात येत असलेल्या वैविध्यपूर्ण उपक्रमांमुळे इतर शुल्कांच्या बाबींमध्ये मोठ्या प्रमाणात वाढ झाल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. त्याचबरोबर इतर शुल्कांच्या बाबनिहाय फीमध्ये महाविद्यालय/ विद्यापीठनिहाय मोठ्या प्रमाणावर भिन्नता दिसून आल्याने, इतर शुल्कांच्या बाबी नेमक्या कोणत्या असाव्यात, याबाबत माहिती व तंत्रज्ञान विभागाने सर्व महाविद्यालयांकडून माहिती मागवून, सर्व प्रशासकीय विभागांसाठी

सर्वसंम्मतीने इतर शुल्कांच्या एकूण १६ बाबी निश्चित केल्या आहेत. इतर शुल्काच्या सदर १६ बाबी ह्या माहिती व तंत्रज्ञान विभागाकडून महाडीबीटी प्रणालीवर अपलोड करण्यात आलेल्या असुन, त्यानुसार सन २०१८-१९ मध्ये अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक लाभ देण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने, आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी संदर्भीय दिनांक २५.११.२०१९ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, इतर शुल्का मधील सदरील १६ बाबी अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांकरीता विहीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ पासून महाडिबीटी प्रणालीद्वारे अनुसूचित जाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना, **भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती व शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती योजनेअंतर्गत** शैक्षणिक लाभ महाडिबीटी प्रणालीद्वारे अदायगीसाठी इतर शुल्कांच्या खालील १६ बाबी विहीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र | इतर शुल्काची बाब |
|---|---|
| १ | प्रवेश फी (अनुदानित /विनाअनुदानित ) |
| २ | प्रयोगशाळा शुल्क |
| ३ | ग्रंथालय शुल्क |
| ४ | जिमखाना शुल्क |
| ५ | विविध गुणदर्शन/उपक्रम शुल्क |
| ६ | कॉलेज मॅगजीन फी |
| ७ | संगणक प्रशिक्षण फी |
| ८ | नोंदणी शुल्क |
| ९ | विद्यापीठ विकास निधी |
| १० | विद्यापिठ क्रिडा निधी |
| ११ | विद्यापीठ अश्वमेध निधी |
| १२ | विद्यापीठ वैद्यकीय मदत निधी |
| १३ | विद्यापीठ विद्यार्थी सहाय्य निधी |
| १४ | विद्यापीठ विद्यार्थी विमा निधी |
| १५ | युथ फेस्टिवल निधी |
| १६ | विद्यार्थी ओळखपत्र शुल्क |

३. इतर शुल्काच्या वरील १६ बाबींच्या शुल्काची अचूक परिगणना करुन, बाबनिहाय शुल्क अंतिम करुन, सदर शुल्क हे समक्ष प्रधिकरण/प्राधिकारी/प्रशासकीय विभाग यांच्या मान्यतेने महाडीबीटी पोर्टलवर अपलोड केल्याचे संबंधित महाविद्यालयाने प्रमाणित करणे अनिवार्य राहील.

४. इतर शुल्कामध्ये समाविष्ट १६ बाबींपैकी एखाद्या बाबीचे शुल्क अवास्तव असल्याचे तसेच सदर शुल्कास समक्ष प्राधिकारी यांची मान्यता नसल्याचे निदर्शनास आल्यास व त्याव्दारे शासनाचे आर्थिक नुकसान झाल्यास, त्यासाठी संबंधित महाविद्यालयाच्या प्राचार्यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येवून, शासनाची आर्थिक फसवणूक केल्याबद्दल त्यांच्याविरुध्द नियमानुसार कारवाई करण्यास येईल, याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांनी आवश्यक त्या सूचना संबंधितांना निर्गमित कराव्यात.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२००११५१७५२१८००२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजाटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नावाने.

Chandrakant haridas Wade

Digitally signed by Chandrakant haridas Wade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justic and S. A., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fda96a8ca4dd3ecbdbbe4b156e5eaa93f60f3e037cbbbbdefe9e2961f45f0960, cn=Chandrakant haridas Wade
Date: 2020.01.16 15:14:57 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

(१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
(२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
(३) मा.मंत्री, सामाजिक न्याय, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
(४) मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
(५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(७) अपर मुख्य सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
(८) अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
(९) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१०) प्रधान सचिव (पदुम), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
(११) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
(१२) प्रधान सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
(१३) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(१४) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
(१५) संचालक, वि.जा.भ.ज., इ.मा.व. व वि.मा.प्र. संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(१६) संचालक, उच्च व तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

(१७) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

(१८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई. (प्रसिध्दीसाठी)

(१९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

(२०) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

(२१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

(२२) प्रादेशिक उपायुक्त/सहायक आयुक्त, समाजकल्याण,सर्व प्रादेशिक विभाग

(२३) सहायक आयुक्त, समाजकल्याण, सर्व जिल्हे.